# कर सहायक गट-क परीक्षा

**१. संवर्ग व पदे याबाबतचा संक्षिप्त तपशील** :-

**१.१** राज्य शासनाच्या विक्रीकर विभागातील कर सहायक, गट-क संवर्गातील पदे शासनाच्या मागणीनुसार व पदांच्या उपलब्धतेनुसार सदर परीक्षेमधून भरण्यात येतात.

**१.२ पदांचा तपशील** :-

**१.२.१ संवर्ग** : -अराजपत्रित, गट - क

**१.२.२ नियुक्तीचे ठिकाण** :- उमेदवारास महाराष्ट्रात कोणत्याही ठिकाणी काम करावे लागेल.

**१.२.३ वेतनबँड व ग्रेड वेतन** :- रुपये ५,२०० - २०,२००, २,४०० अधिक महागाई भत्ता व नियमाप्रमाणे देय इतर भत्ते.

**१.२.४ उच्च पदावर बढतीची संधी** :- ज्येष्ठता व पात्रतेनुसार विक्रीकर निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित).

**१.३** शासनाच्या मागणीनुसार भरावयाच्या पदांचा तपशील, पदसंख्या, आरक्षण, अर्हता, इत्यादी बाबी जाहिरात/अधिसूचनेद्वारे उमेदवारांना उपलब्ध करून देण्यात येईल.

**२. परीक्षेचे टप्पे** :- फक्त लेखी परीक्षा. एकूण ४०० गुण

**३. अर्हता** :-

**३.१** सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा शासनाने तिच्याशी समकक्ष म्हणून जाहीर केलेली अर्हता.

**३.२** मराठी टंकलेखनाचा वेग किमान ३० शब्द प्रति मिनिट आणि इंग्रजी टंकलेखनाचा वेग किमान ४० शब्द प्रति मिनिट या अर्हतेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र परीक्षा अथवा या उद्देशासाठी शासनाने समकक्ष म्हणून घोषित केलेली प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण.

**३.३** उमेदवाराला मराठी लिहिणे, वाचणे, बोलता येणे अत्यावश्यक आहे.

**४. शुल्क (फी)** :-

**४.१** प्रस्तुत परीक्षेंकरिता आयोगाकडून आकारण्यात येणारे शुल्क खालीलप्रमाणे आहे :-

| अमागास | मागासवर्ग | माजी सैनिक |
|---|---|---|
| रुपये ५१५/- | रुपये ३१५/- | रुपये २०/- |

**४.२** वि.जा.(अ),भ.ज.(ब),वि.मा.प्र.,भ.ज.(क),भ.ज.(ड) व इ.मा.व. या प्रवर्गातील उन्नत व प्रगत गटात(क्रीमी लेअर) मोडणाऱ्या उमेदवारांनी त्यांना आरक्षणाचा व वयोमर्यादेचा फायदा देय नसल्याने त्यांनी अमागास उमेदवारांप्रमाणे परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

**४.३** उन्नत व प्रगत गटासंदर्भातील (क्रीमी लेअर)उत्पन्नाची मर्यादा तसेच अन्य तद्अनुषंगिक बाबी शासनाने वेळोवेळी जारी केलेल्या आदेशानुसार राहतील.

**४.४** दिनांक १ जानेवारी, १९६४ ते २५ मार्च, १९७१ या कालावधीत पूर्व पाकिस्तानातून स्थलांतर करून भारतामध्ये आलेल्या आणि दिनांक १ जून,१९६३ नंतर स्थलांतर करून भारतात आलेल्या मूळचे भारतीय असलेल्या श्रीलंकेतील स्वदेश प्रतावर्ती उमेदवारांनी कोणतेही परीक्षा शुल्क भरण्याची आवश्यकता नाही.

**५. परीक्षा योजना** :-

**५.१ प्रश्नपत्रिका** :- एक. प्रश्नपत्रिकेचा तपशील खालीलप्रमाणे :-

| विषय<br>(संकेतांक ०२८) | दर्जा | माध्यम | प्रश्नांची संख्या | एकूण गुण | कालावधी | प्रश्नपत्रिकेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|---|
| मराठी | बारावी | मराठी | २०० | ४०० | दोन तास | वस्तुनिष्ठ बहुपर्यायी |
| इंग्रजी | बारावी | इंग्रजी | | | | |
| सामान्य ज्ञान, बुध्दीमत्ता चाचणी | पदवी | मराठी व इंग्रजी | | | | |
| मुलभूत गणितीय कौशल्य | दहावी | | | | | |
| पुस्तकपालन व लेखाकर्म<br>(Book-Keeping & Accountancy) | बारावी | | | | | |

**५.२ अभ्यासक्रम** : -

**मराठी, इंग्रजी, सामान्य ज्ञान, बुध्दिमत्ता चाचणी आणि पुस्तपालन व लेखाकर्म या विषयामध्ये खालील घटक/ उपघटकांचा समावेश असेल**:-

(एक) **मराठी** :-सर्वसामान्य शब्दसंग्रह, वाक्यरचना, व्याकरण, म्हणी व वाक्यप्रचार यांचा अर्थ, वाक्यात उपयोग तसेच उताऱ्यावरील प्रश्नांची उत्तरे

(दोन) **इंग्रजी** : - Common vocabulary, Sentence structure, Grammar, Use of Idioms & Phrases and their meaning and Comprehension of passage.

(तीन) **सामान्य ज्ञान** -

**(१) आधुनिक भारताचा विशेषत: महाराष्ट्राचा इतिहास**

**(२) महाराष्ट्राचा भूगोल** - पृथ्वी, जगातील विभाग, हवामान, अक्षांश-रेखांश, महाराष्ट्रातील जमीनीचे प्रकार, पर्जन्यमान, प्रमुख पिके, शहरे, नद्या, उद्योगधंदे, इत्यादी

**(३) नागरिकशास्त्र** - भारताच्या घटनेचा प्राथमिक अभ्यास, राज्य व्यवस्थापन (प्रशासन), ग्राम व्यवस्थापन (प्रशासन)

**(४) भारतीय राज्यघटना** - घटना कशी तयार झाली आणि घटनेच्या प्रस्तावनेमागची भूमिका व तत्वे, घटनेची महत्वाची कलमे / ठळक वैशिष्टये, केंद्र व राज्य संबंध, निधर्मी राज्य, मूलभूत हक्क व कर्तव्ये, राज्याच्या धोरणाची मार्गदर्शक तत्वे-शिक्षण, युनीफॉर्म सिव्हील कोड, स्वतंत्र न्यायपालिका, राज्यपाल, मुख्यमंत्री व मंत्रीमंडळ-Role, अधिकार व कार्य, राज्य विधीमंडळ-विधानसभा, विधानपरिषद व त्यांचे सदस्य, अधिकार, कार्य व Role, विधी समित्या.

**(३.५) पंचवार्षिक योजना**

(चार) **चालू घडामोडी** - जागतिक तसेच भारतातील

(पाच)**बुध्दिमत्ता चाचणी** -उमेदवार किती लवकर व अचूकपणे विचार करु शकतो याचा अंदाज घेण्याच्या दृष्टीने सदर प्रश्न विचारण्यात येतील.

(सहा) **पुस्तपालन व लेखाकर्म** (Book-Keeping & Accountancy) —

लेखाकर्म अर्थ, लेखा संज्ञा, द्विनोंद पध्दतीची मुलभूत तत्वे, लेखाकर्माकरिता दस्तऐवज, रोजकिर्द, सहाय्यक पुस्तके, खतावणी, बँक मेळजुळणी पत्रक, तेरीज पत्रक, घसारा, अंतिम लेखे, वित्तिय विवरणपत्रके तयार करणे, नफा न कमविणा-या संस्थांची खाती.

Bookkeeping meaning & definition, Accounting terminology, Fundamentals of Double Entry, Source documents for accounting, Journal, Subsidiary Books, Ledger, Bank Reconciliation Statements, Trial Balance, Depreciation, Final Accounts, Preparing Financial Statements, Accounts of Not for profit concerns.

(सात) **आर्थिक सुधारणा व कायदे** - पार्श्वभूमी, उदारीकरण, खाजगीकरण, जागतिकीकरण संकल्पना व त्याचा अर्थ आणि व्याप्ती, मर्यादा, केंद्र व राज्य स्तरावरील आर्थिक सुधारणा, WTO तरतुदी आणि सुधारणा आणि त्याचे भारतीय अर्थव्यवस्थेवरील अपेक्षित परिणाम, प्रश्न व समस्या, GST. विक्रीकर, VAT, WTO, इत्यादीशी संबंधीत कायदे/नियम.

**६. परीक्षा केंद्र** :-

**६.१** खालील ठिकाणी सदर परीक्षा घेण्यात येईल **:-**

| केंद्र | संकेतांक |
|---|---|
| अहमदनगर | ११ |
| अकोला | १२ |
| अलिबाग | १३ |
| अमरावती | १४ |
| औरंगाबाद | १५ |
| बीड | १६ |
| भंडारा | १७ |
| बुलढाणा | १८ |
| चंद्रपूर | १९ |
| धुळे | २० |
| गडचिरोली | २१ |
| गोंदिया | २२ |

| केंद्र | संकेतांक |
|---|---|
| हिंगोली | २३ |
| जळगाव | २४ |
| जालना | २५ |
| कोल्हापूर | २६ |
| कुडाळ | २७ |
| लातूर | २८ |
| मुंबई (मध्य) | ३० |
| मुंबई (पश्चिम) | ३१ |
| नागपूर | ३२ |
| नांदेड | ३३ |
| नंदुरबार | ३४ |
| नाशिक | ३५ |

| केंद्र | संकेतांक |
|---|---|
| उस्मानाबाद | ३६ |
| परभणी | ३७ |
| पुणे | ३८ |
| रत्नागिरी | ३९ |
| सांगली | ४० |
| सातारा | ४१ |
| सोलापूर | ४२ |
| ठाणे | ४३ |
| वर्धा | ४४ |
| वाशीम | ४५ |
| यवतमाळ | ४६ |
| पालघर | ४७ |

६.२ विहित पद्धतीने ऑनलाईन माहिती सादर करताना उमेदवारांनी केलेल्या मागणीनुसार व उपलब्धतेनुसार जिल्हाकेंद्रांवरील विविध उपकेंद्रांवर पात्र उमेदवारांना प्रवेश देण्यात येईल.

६.३ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ अथवा बदल होऊ शकतो.

६.४ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमधून कोणतेही एक केंद्र ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करताना निवडणे आवश्यक आहे.

६.५ एखादे केंद्र परीक्षेकरिता कार्यान्वित होऊ शकले नाही तर त्या केंद्रावरील उमेदवारांची व्यवस्था जवळच्या दुस-या जिल्हाकेंद्रावर करण्यात येईल. असा बदल केल्यास त्याबाबतची सूचना आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द केली जाईल.

६.६ अर्जात एकदा नमूद केलेल्या केंद्रामध्ये बदल करण्याची विनंती कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

७. **लेखी परीक्षेचा निकाल** :-

**७.१** वस्तुनिष्ठ स्वरुपांच्या उत्तरपत्रिकांचे मुल्यांकन करताना उत्तरपत्रिकेत नमूद केलेल्या योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच प्रत्येक चार चुकीच्या उत्तरामागे एका प्रश्नाचे गुण एकूण गुणांमधून वजा करण्यात येतील.

**७.२** भरावयाच्या एकूण पदांपैकी प्रत्येक आरक्षित प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी २ पट उमेदवार प्रमाणपत्र पडताळणीसाठी उपलब्ध होतील, अशा रितीने गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल. सदर सीमारेषा सर्व उमेदवारांसाठी एकच किंवा प्रत्येक सामाजिक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी तसेच महिला, खेळाडू इत्यादींसाठी वेगवेगळी असेल.

**७.३** प्रत्येक प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी आयोगाने निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना त्यांनी अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे, ते विहित अटींची पूर्तता करतात असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात प्रमाणपत्र पडताळणीसाठी पात्र समजण्यात येईल.

**७.४** विकलांग, अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू अथवा माजी सैनिक या प्रवर्गाच्या किमान सीमा रेषेच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरणा- या उमेदवारास कोणतीही एकच सवलत घेता येईल.

**७.५** निकाल जाहीर झाल्याची बातमी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यात येईल.तसेच, मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला ईमेलद्वारे व मोबाईल क्रमांकावर एसएमएसद्वारे वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल.

**७.६** अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र असलेल्या विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती (ब), विशेष मागास प्रवर्ग, भटक्या जमाती (क), भटक्या जमाती (ड), व इतर मागास वर्ग या प्रवर्गातील उमेदवार तसेच अपंग, महिला, माजी सैनिक व पात्र खेळाडू उमेदवार लेखी परीक्षेत केवळ त्यांच्यासाठी विहित केलेल्या निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त झाल्यास अंतिम शिफारशींच्या वेळी त्यांची उमेदवारी केवळ त्या त्या संबंधित प्रवर्गासाठी विचारात घेतली जाईल. निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची उमेदवारी सर्वसाधारण (अमागास) पदासाठी विचारात घेतली जाणार नाही.

८. **प्रमाणपत्र पडताळणी** :-

८.१ पात्र उमेदवारांना प्रमाणपत्र पडताळणीसाठी बोलविण्यात येईल.

८.२ आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे तपासली जाईल.

८.३ अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

८.४ विहित कागदपत्रे सादर करू न शकणा-या उमेदवारांची उमेदवारी रद्द करण्यात येईल. तसेच त्याकरिता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

८.५ वरीलप्रमाणे लेखी परीक्षेच्या निकालाचा आधारे पात्र ठरणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी आयोगाच्या कार्यक्रमानुसार तसेच आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस घेण्यात येतील.

९. **अंतिम निकाल** : -

लेखी परीक्षेमध्ये प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे गुणवत्ताक्रमानुसार यादी (Merit List) तयार करण्यात येईल. सदर गुणवत्ता यादीमध्ये समान गुण धारण करणा-या उमेदवारांचा प्राधान्यक्रम (Ranking) **“ उमेदवारांना सर्वसाधारण सूचना ”** मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार ठरविण्यात येइल.

**१०. शिफारस** :-

**१०.१ “उमेदवारांना सर्वसाधारण सूचना ”** मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार उमेदवारांच्या शिफारसी शासनाच्या संबंधित विभागाकडे पाठविण्यात येईल.

**१०.२** प्रस्तुत लेखी परीक्षेमधून शिफारसपात्र होण्याकरिता शतमत (**Percentile**) पध्दत लागू आहे. प्रस्तुत परीक्षेमध्ये

सर्वाधिक गुण मिळविणा-या उमेदवारांच्या एकूण गुणांच्या खालीलप्रमाणे किमान गुण प्राप्त करणारे उमेदवार शिफारशीसाठी पात्र असतील :-

(१) **अमागास- किमान ३५ शतमत**

(२) **मागासवर्गीय -किमान ३० शतमत**

(३) **विकलांग- किमान १० शतमत**

(४)**अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू – किमान २० शतमत**

(५) **माजी सैनिक –किमान २० शतमत**

**१०. ३** विकलांग अथवा अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू अथवा माजी सैनिक या प्रवर्गाच्या किमान सीमारेषेच्या आधारे शिफारशीसाठी पात्र ठरणा-या उमेदवारास कोणतीही एक सवलत घेता येईल.

**१०.४** परीक्षेस उपस्थित राहिलेल्या उमेदवारांना शिफारसीनंतर त्यांची नियुक्तीसाठी शासनाकडे शिफारस करण्यात आली आहे किंवा नाही, ते ईमेलद्वारे कळविण्यात येईल. तसेच, शिफारस झालेल्या उमेदवारांची नावे आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात येतील.

************